॥ श्री एकनाथ सुप्रसन्न ॥

श्री एकनाथ ग्रंथसार प्रकाशन, पैठण



# - पैठण पहा -

आवृत्ती तिसरी

एकनाथमाला क्रमांक २




लेखक :- गणपतबुवा भानुदासबुवा नाथवाले, पैठणकर.



प्रकाशक कमलाकर गणपतबुवा नाथवाले पैठणकर




बोध चिन्ह :- ▲ घाट, ▭ मठ, O मंदिर, ⊥ विजयस्तंभ, ⬭ दरगा, X औषधालय ● बस स्टॅन्ड.

# : प्रस्ताविक :

पैठण येथे येणाऱ्या यात्रेकरुंना पैठण येथील सर्वसाधारण उपयुक्त माहिती मिळावी या हेतूनें मी या पुस्तकाचें प्रकाशन करण्याचा प्रयत्न केला आहे. हे पुस्तक प्रसिद्ध व्हावें असें बहुतेक लोकांना वाटत असल्याचेही दिसून आले. या पुस्तकांत पैठण येथें येण्याचें मार्ग तसेंच येथें होऊन गेलेल्या संताची संक्षिप्त चरित्रे, व इतर प्रेक्षणीय स्थलांची उपयुक्त माहिती फारच थोडक्यांत लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. तिसऱ्या आवृत्तीमध्यें लोकांच्या अनेक सूचना लक्षांत घेऊन अनेक स्थळांचे छाया चित्रे घातली आहेत. आपल्या सर्वांच्या सहकार्यानें या पुस्तकाचा उपक्रम यशस्वी होईल. ही सदिच्छा.

श्री. एकनाथबुवा साहेब वकील यांच्या सहकार्याबद्दल आभारी आहे

आषाढ शुद्ध १२
शके १८८८
नाथाचा वाडा पैठण.

आपला,
**गणपतबुवा पैठणकर** (शिक्षक)
कन्या शाळा, पैठण.

**इतर प्रकाशनें :-**

१) नाथ फोटो २) काकड आरती ३) चिरंजीव पद, ४) भारुडे व शेजारती.

**विनंती पत्रक :-**

श्री एकनाथ चरित्राची मागणी होऊ लागली आहे. आर्थिकदृष्ट्या त्याचे प्रकाशन होणें अवघड आहे. लोकांच्या आग्रहावरुन नाथ-चरित्र प्रकाशनाचें कार्य हाती घेतलें आहे, तरी नाथ भक्तांनी अवश्य यथाशक्ति मदत करावी. तसेंच कार्यालयांत नाथांचें सर्व वाङमय मिळण्याची व्यवस्था केली आहे.

आपली,
**सौ. शारदाबाई नाथवाले.**
व्यवस्थापक.

# पैठण पहा

**पैठण येथें येण्याचे मार्ग –**

१) औरंगाबादेहुन पैठण ३२ मैल आहे बस सर्व्हिसची उत्तम सोय आहे.

२) पुणे ते पैठण ( अहमदनगर मार्गे ) थेट बसची व्यवस्था आहे.

३) ( बीड मार्गे ) पाचोडहून पैठण येथें येण्यासाठी आतां बस सर्व्हिस सुरु झाली आहे.

**उतरण्याची सोय –**

पैठण येथें आल्यावर उतरण्यासाठीं १ बाहेरील श्री नाथ मंदीर २ मारवाडी धर्मशाळा, ३ श्रीरामलाल बाबा भोपळे यांचाहि एक मठ आहे शिवाय आणखीहि धर्मशाळा आहेत

**प्रतिष्ठानचे उल्लेख –** माजी जिल्हाधिकारी, औरंगाबाद श्री. **सेतु माधवराव पगडी** यांनी एक प्रतिष्ठान फलक गांवातील नाथ मंदिरात लाविलेला आहे. त्यांत पैठणचे उल्लेख दिलें आहेत. त्या वरुन पैठणच्या इतिहासाची पूर्णपणें माहिती मिळते.

**श्री एकनाथ --** जन्म शके १५५२ ( नाथांच्या जन्मकालाबद्दल मतभेद आहेत. ) निर्याण शके १५२१ फाल्गुन वद्य ६ रविवार, वडीलांचे नांव सूर्यकांत, आई रुक्मिणीबाई. लुहानपणी आई वडील वारले. आजा-आजीने पालन पोषण केले. लहानपणापासून विरक्त. श्रीजनार्दन स्वामीचा उपदेश, त्यांच्या आज्ञेप्रमाणें पैठण येथे अवतार कार्य केले.



जनार्दन महाराजांच्या आज्ञेवरून नाथांनी चतुःश्लोकी भागवतावर टीका लिहिली. हा त्यांचा पहिला ग्रंथ आहे



नाथ भागवत वाचित असताना काशीतील पंडितांनी त्यांचा ग्रंथ भागिरथींत फेकून दिला, तो भागिरथीने प्रत्यक्ष श्रीपाद स्वामींना परत केला

नाथांचे मुख्य ग्रंथ एकनाथी भागवत, भावार्थ रामायण, रुक्मिणी-स्वयंवर, चतुःश्लोकी भागवत, हस्तामलक, शुष्काष्ठक, स्वात्मसुख, आनंदलहरी, पदे, भारुडे, इत्यादि प्रसिद्ध आहेत. दरवर्षी फाल्गुन वद्य ५ तें ८ पर्यन्त यात्रा भरत असतं.

**श्री कृष्ण दयार्णव--** राहणारें कोपारुड अथवा कोपरडे. वडिलांचे नांव शंभुमणि, आईचें नांव बहिणाबाई अथवा बहिणादेवी. जन्म वैशाख शुद्ध ३ शके १५९६ लहानपणी लग्नानंतर आई वडील स्वर्गवासी झाले. गोविंदमहाराजांचा अनुग्रह, सांप्रदाय एकनाथांचाच आहे. यांचें मुळचे नांव नरहरी होते. कृष्ण उपासक व कृष्ण कृष्ण नेहमी नामस्मरण करीत असल्यामुळे 'कृष्ण दयार्णव' असे लोक म्हणू लागले.

निर्माण शके १६६२ मार्गशीर्ष शुद्ध ५ रोज गुरुवार श्री दयार्णवाचे मुख्य ग्रंथ १. हरिवरदा, २. विचार चंद्रिका, ३. दत्त जननोत्सह. ४ तन्मयानंद बोध इत्यादी प्रसिद्ध आहेत.
पैठण येथे दरवर्षी मार्गशीर्ष शुद्ध ३ ते ६ पर्यन्त उत्सव होतो.

**श्री अमृतराय--** हे मूळचे राहणारे फत्तेखेरडा ता. मेहकरचे होते. जन्म काल शके १६२०, औरंगाबाद येथे वास्तव्य, मध्वमुनीचा सहवास झाला व त्यांचाच अनुग्रह मिळाला. हे एक प्रसिद्ध किर्तनकार तसेच उत्तम कवीहि होतें. हिंदी भाषा फारच उत्तम अवगत होती. याचे कटाव पदे अभंग प्रसिद्ध आहेत. निर्याण शके १६७५ चैत्र शुद्ध ६. दर वर्षी पैठण येथें चैत्र शुद्ध ५ ते ८ पर्यन्त उत्सव होत असतो.

**श्री शिवदीन नाथ--** मुळचे राहणारे पैठण. घराणा जोशी वडिलांचे नांव हरिहर, आईचें नांव सरस्वतीबाई. शिवद्दीन नाथांचें मूळ नांव सदाशीव पुढे चालून शिवद्दीन नाथ झाले यांचा जन्म शके १६२० वैशाख कृष्ण ७ शुक्रवारी झाला. हें योग साधनी पुरुष होते. केसरी नाथांचा अनुग्रह झाला. तें पार्थीव पुजा नित्य करीत असत. त्यांनी

अनेक अभंग, पदे केली आहेत. त्यांनी 'ज्ञान प्रदीप' नांवाचा प्राकृत ग्रंथ लिहीला आहे. निर्याण शके १६९६ माघ वद्य १४ सोमवार महा-शिवरात्रीचें दिवशी.

दर वर्षी माघ वद्ध १४ ते फाल्गुन शुद्ध १ पर्यन्त उत्सव होत असतो.

**बाहेरील नाथ मंदीर--** या भागाला पूर्वी वृंदावन म्हणत असत. या ठिकाणी श्री ब्रम्हदेवाने श्री गोपाल कृष्णाच्या सगुण दर्शना-साठीं बारा वर्षे पर्यन्त अनुष्ठान केले. त्यावर भगवान गोपाल कृष्ण प्रसन्न झाले व त्यास दर्शन देण्यासाठी तेथें आलें.



भगवंताचें दर्शन होताच ब्रम्हदेवास आनंद झाला व त्यांने देवास असा वर मागितला कीं आपलें दर्शन मला नित्य घडेल व आपलें अस्तित्व तेथें सदोदित राहील असा उपाय सांगा.

या प्रमाणें वर मागितला असता गोपाल कृष्णानें ब्रम्हदेवास वृन्दावनाची स्थापना व या सद्या असलेल्या पादुकेची स्थापना करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ब्रम्हदेवानें वृन्दावनाची व या पादुकेची स्थापना प्रत्यक्ष गोपाल कृष्णाकडून केली. व ब्रम्हदेवास लक्ष्मी सह दर्शन देऊन त्याचा मनोरथ पूर्ण केला अशी दंतकथा ऐकण्यांत आली आहे.

वरील प्रमाणेंच बिल्व मंगल ब्राम्हणाची हकिकत तिष्ठान महात्म्यांत वर्णन केली आहे व त्यालाहि श्रीकृष्णाचा साक्षात्कार येथेंच झाला.

**कृष्ण कमला तीर्थ--** बाहेरील नाथमंदिराच्या पश्चिम भागात वाहणाऱ्या गंगा प्रवाहास कृष्ण कमला तीर्थ म्हणतात. येथें गोपाल-कृष्णाने व जांबुवंतीनें स्नान केलें, स्नान करीत असता क्षणी जांबुवतीला लक्ष्मीचे सौंदर्य प्राप्त झालें. नाथ देखील दररोज त्रिकाल स्नान येथेच करीत असत. या भागाबद्दल खालील श्लोक व तुकारामाचा अभंग प्रसिद्ध आहे

श्लोक:-- प्रतिष्ठानमिजं क्षेत्र सर्व तीर्थै: सुमंडित। स्वनिवासार्थमकरो-त्ब्रम्हा लोक पितामह: ॥१॥ अभंग ॥ तुकाराम चरण २/३ कष्ण कमला तीर्थ चरण नाथांचे। उद्धरी जगाचें कलि दोष ॥२॥ तीर्थी जो स्नान तत्पदीगमन पूर्वजा उद्धरण कुळासहित ॥३॥ तुका म्हणें वारी तथा बोलणें

**नाथांची समाधी--** श्री एकनाथ महाराज देखील याच पादुकेचीं पूजाअर्चा करीत होते. शिवाय गोकुल अष्टमी व नाथषष्टीच्या वेळीं येथेंच दिंडी, किर्तन व काला करीत असत. आतांहि येथेंच दहिहंडीं, किर्तन वगैरे नाथषष्ठींच्या वेळेंस होत असतें. नाथ निर्याणानंतर याच समाधीला "नाथ समाधी" असे नांव पडलें. नाथाचा अवतार कृष्णाचाच होता असें म्हटल्यास चूक होणार नाही.

**वानोळे साहूकारांची यज्ञभूमी--** बाहेरींल नाथ मंदिराच्या पश्चिम दरवाजाजवळ जी दगडाची फरशी आहे तेथें वानोळें यांनी यज्ञ केला असे सांगण्यांत येतें व त्यांचा वाडा गांवातील नाथमंदिराजवळ आहे. याच भागांत श्रीदत्तमंदिर, श्री गाढेश्वर मंदिर. श्री ढोलेश्वर मंदिर, श्री झेंडूजीबुवाचा मठ, श्री गिरजा देवीचें स्थान आहे. परदेश-पुऱ्यात एक पुरातन जैन मंदीर ही पाहण्या सारखे आहें.

गांवातील नाथ मंदीरास येतानां श्री उदासी बुवांचा मठ, श्री कृष्ण दयार्णवाचा मठ, श्री शिवदीन नाथांचा मठ व गांवातील अमृतरायजींचा मठ आहें. येथील श्रीकृष्णमूर्ति पाहण्यासारख्या आहेत.

**गांवातील नाथ मंदिर** -- या मंदिराच्या महाद्वाराचे भितीला श्री दत्तात्रयाचे चित्र प्रत्येक गोकुळ अष्टमीच्या उत्सवाचे वेळीं काढण्यांत येतें. नाथांच्या घरीं श्री दत्तात्रयानें चोपदारकीचे कार्य केले असल्याचा तो इतिहास आहे. श्रीसंत दासोपंतांना याच महाद्वारांत श्री दत्तात्रयाचे सगुण दर्शन झाले. ए. च. केशवकृत अध्याय २५ मध्यें याचा उल्लेख आहें.

**नाथाचा रांजण** – मंदिरांत गेल्या वर डाव्या बाजूला देवाचा रांजण आहे. या रांजणांत श्री गोपाल कृष्णाने श्रीखंडयाचें रुप घेऊन बारा वर्षे श्री नाथ घरी आवडीनें व कावडीने पाणी वाहिले. आहे. फाल्गुन वद्य २ ग, या रांजणाचा उत्सव असतो. यांत बाराहि महिने पाणी असते.

**नाथांचा राहता वाडा** – रांजणाला लागूनच नाथांचा राहता वाडा आहे. या वाडयांत त्यांचे वंशज श्री. भागवतबुवा हल्ली राहतात

**पुराण व उद्धव खांब** – मंदिराच्या गाभाऱ्यांत प्रवेश करतांना समोर दोन खांब आहेत. दक्षिण बाजूच्या खांबाला टेकून नाथ पुराण सांगण्यासाठीं बसत असत व उत्तर बाजूचा खांब उद्धव खांब आहें. त्यावर 'श्री उद्धव' ही अक्षरे आहेंत. याच खांबातून श्री खंडया रुपी श्री कृष्ण प्रगट झाले व नाथांना दर्शन दिले.

**मंदिराच्या गाभाऱ्यात** -- हे नाथाचे वंशपरंपरेचे देव घर मुख्य मुर्ति श्री विजयी पांडूरंगाची आहे. 'दास जेऊं घाला न घाला' अशी अक्षरें उमटलेल्या विटेवर उभी आहे. नाथानींच या मूर्तीची स्थापना केली. ए. च. केशवकृत अध्याय १३ यांत हे प्रकरण आहे. त्याची थोडक्यांत हकिकत पुढीलप्रमाणें आहें







ज्या श्रीकृष्णानी श्रीखंड्याचे रूप घेऊन १२ वर्षेपर्यंत कावडीनें पाणी वाहिलें व गंध उगाळलें ते छायाचित्र



नाथ किर्तनद्वारा लोंक जागृती करीत आहेत.

कर्नाटक प्रांतातील एका श्रीमंत साहुकारानें वरील मुर्ति आपल्या घरी स्थापण करण्यांकरितां पंच धातूंची तयार केली व प्राणप्रतिष्ठा करणार. तो त्याला रात्रीं दृष्टांत झाला कीं " तूं येथें स्थापन करू नकोस, पैठण येथें श्री एकनाथांचे घरी मला घेऊन जा व नाथाच्या घरी नाथांचे हस्ते तेथेच स्थापना कर.

श्लोक :- " गंगातीरी प्रतिष्ठान । तेथें एकनाथ असे जाण ।
शीघ्र जाऊनि आपण । मूर्ति अर्पण कीजे त्या ॥१॥
तेथेचि व्हावी प्रतिष्ठा। हे माझी निज उत्कंठा।
येथें आग्रह करितां कष्टा। अति उत्कटा भोगिसी ॥२॥

त्या प्रमाणें तो मूर्तीस पैठण येथें घेऊन आला नाथांनी मूर्तीची स्थापना केली आरतीच्या वेळीं-

" नाथ म्हणती तये वेळा । या काळाचा सूख सोहळा ।
भक्षूनि नवनीत गोळा । देव लीला प्रगटावी ॥

या प्रमाणें नाथांनी प्रार्थना करतांच- ऐकोनि श्री नाथ वचन
मूर्ति होऊनि हास्य वदन । बाहेर जीभ काढून ।
करतळ चाटून भक्षिले ॥

हा प्रकार पहाताच सर्वांनी जय जयकार केला. आरती झाल्यावर नाथांनी त्या मूर्तीचे नांव ' विजयी पांडुरंग ' असे ठेविले आहे.

**श्री खंड्या चंदन उगाळूनि --** गाभाऱ्यांत उजव्या बाजूस विठ्ठल रुक्मिणीच्या मूर्ति आहेत. तेथेच श्रीखंड्यानें ज्या साहणेवर गंध उगाळिलें तीं साहाण स्थापन केलेली आहे.

**नाथास गुरुपत्र दर्शन --** मंदिराच्या उत्तरेकडे मुंजाचे नाथ-कालीन एक स्थान आहे. येथेंच नाथांची व त्यांच्या आजोबाची तिर्थ-यात्रे नंतर भेट झाली. व त्यांनी नाथानां जनार्दन स्वामीचें गुरु-पत्र

दिलें. व नाथ पुढें येंथेच राहिले. येंथेच नाथाचें आजोबा चक्रपाणी व त्यांचें कुटुंब सौ. सरस्वतीबाई राहत होते.

**पुर्वीचें पैठण** – नागघाटाच्या पूर्व भागाला पूर्वी पैठणची वस्ती होती या भागात तीर्थ खांब, महानुभाव पंथाचे पुरातन मंदिर अथवा मठ आहें. शालिवाहनाचा राजवाडा देखील याच भागांत होता. असें मागण्यांत येते. श्री. धोंडिबुवाचा मठ याच भागांत आहें

**ज्ञानेश्वराचा रेडा** -- या घाटावर ज्ञानेश्वराने रेड्यामुखी वेद बोलविलें आहेत त्याचा साक्ष अथवा प्रतीक म्हणून येथें एक दगडाचा रेडा भितीत बसविलेला दिसत आहे. नाग घाटाच्या मोठया बुरुजावर दोन शिला लेखापैकीं, एका शिला लेखावरुन घाट केंव्हां व कोणी बांधला याचा इतिहास मिळू शकतो. दुसरा लेख पाण्यामुळें झिजून गेला लेखाचा सारांश शके १६५६ माघ शु।। ९ रघुपति तनयें घ ट आनंद राय अशी अक्षरे वाचतां येतात. इतर अक्षरे स्पष्ट वाचता येत नाहीत.

**चर ओटा** -- ज्या ओटयावर बसून पैठणचें ब्राम्हण नाथांची अथवा इतरांची निंदा करत तो कुचर ओटा गांवात परळ करांच्या मठाजवळ आहें.

दरगा :– सध्या गांवाच्या पुर्व भागाला श्री मौलाना साहेबाची तसेंच **श्री** सय्यद सादात साहेबांची हि दरगा आहे.

**नव नाथाच्या समाध्या** -- याच भागांत कुलभाआळोजवळ पांच सहा वर्षापूर्वी कांही समाध्यांचा शोध लागला आहे. या समाध्या भुयारांत असून नव-नाथांच्या आहेत. असे सांगण्यांत येतें, या शिवाय श्री नृसिह मंदीर व हरिहरेश्वराचे मंदिर व रेणुकादेवी इत्यादि प्रसिद्ध स्थळे आहेत.



फा. व. ६ रविवार शके १५२१ रोजीं कृष्ण कमला तीर्थाच्या भव्य वाळवंटात ‘ अवघेचि त्रैलोक्य आनंदाची आता ’ या आभंगावर कीर्तन करुन नाथानीं आपले कार्य संपविलें.

**ज्ञानेश्वराची जन्मभूमी –** पैठणहून ६ मैल पूर्वेस ज्ञानेश्वराची जन्मभूमि आपेगांव आहे. तेथें कार्तिक वद्य १३ दर वर्षी मोठा उत्सव होत असतो.

**कृष्ण कमला मंदिर–** बाहेरील नाथ मंदिराच्या पश्चिम भागांत कै. ह. भ. प. नारायणबुवा पालखीवाले यांची समाधी असून त्यांच्या स्मरणार्थ कृष्ण कमला मंदीराची स्थापना केली आहे. मूर्ति प्रेक्षणीय आहेत.

**गोदावरी धरण--** पश्चिम व पुर्व दिशेला पैठणहून २ मैलाच्या अंतरावर जयकवाडी धरण (गोदावरी धरण) योजनेचे काम सुरु आहे.

**– वार्षिक महोत्सव –**

१) जेष्ट वद्य ७ स श्री नाथांची पालखी पैठणहुन पंढरीस जाते
२) आषाढ शुद्ध ११ ते आषाढ वद्य १, भानुदास महाराजांची पुण्य तिथी साजरी होते.
३) श्रीकृष्ण जयंति श्रावण वद्य ८ ते १२ पर्यन्त.
४) हरिजागर कार्तिक शुद्ध ११ ते कार्तिक वद्य १ .
५) श्री दत्त जयंती, मार्गशीर्ष शुद्ध १५ .
६) रांजणाचे पूजन, फाल्गुन वद्य २ .
७) नाथ-षष्ठी फाल्गुन वद्य ६ ते ८ ला काला व लळीत होते.

समाप्त

सर्व प्रकारची छपाई व बायंडिग करितां-

## - ज्योति प्रिंटींग प्रेस, -

**पैठण. (जि. औरंगाबाद)**

यांनाच अवश्य भेट द्या।

.........सर्व प्रकारचे काम सुंदर व वेळशीर करुन मिळेल. ........







( ज्योति प्रिंटींग प्रेस, पैठण. )

तृतियावृति ) मूल्य : २० पैसे ( २०००

।। श्री एकनाथ सुप्रसन्न ।।

श्री एकनाथ ग्रंथसार प्रकाशन, पैठण



# - पैठण पहा -

आवृत्ती तिसरी

एकनाथमाला क्रमांक २



लेखक :- **गणपतबुवा भानुदासबुवा नाथवाले,** पैठणकर.

प्रकाशक :- कमलाकर गणपतबुवा नाथवाले, पैठणकर




बोध चिन्ह :- ▲ घाट, ▭ मठ, O मंदिर, ⊥ विजयस्तंभ, ⬭ दरगा, X औषधालय ● बस स्टॅन्ड.

# : प्रस्ताविक :

पैठण येथे येणाऱ्या यात्रेकरुंना पैठण येथील सर्वसाधारण उपयुक्त माहिती मिळावी या हेंतूनें मी या पुस्तकाचें प्रकाशन करण्याचा प्रयत्न केला आहे. हे पुस्तक प्रसिद्ध व्हावें असें बहुतेक लोकांना वाटत असल्याचेही दिसून आले. या पुस्तकांत पैठण येथें येण्याचें मार्ग तसेंच येथें होऊन गेलेल्या संताची संक्षिप्त चरित्रे, व इतर प्रेक्षणीय स्थलांची उपयुक्त माहिती फारच थोडक्यांत लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. तिसऱ्या आवृत्तीमध्यें लोकांच्या अनेक सूचना लक्षांत घेऊन अनेक स्थळांचे छाया चित्रे घातली आहेत. आपल्या सर्वांच्या सहकार्यानें या पुस्तकाचा उपक्रम यशस्वी होईल. ही सदिच्छा.

श्री. एकनाथबुवा साहेब वकील यांच्या सहकार्याबद्दल आभारी आहे

आषाढ शुद्ध १२
शके १८८८
नाथाचा वाडा पैठण.

आपला,
**गणपतबुवा पैठणकर** (शिक्षक)
कन्या शाळा, पैठण.

**.इतर प्रकाशनें :–**

१) नाथ फोटो २) काकड आरती ३) चिरंजीव पद, ४) भारुडे व शेजारती.

**विनंती पत्रक :–**

श्री एकनाथ चरित्राची मागणी होऊ लागली आहे. आर्थिकदृष्टया त्याचे प्रकाशन होणें अवघड आहे. लोकांच्या आग्रहावरुन नाथ-चरित्र प्रकाशनाचें कार्य हाती घेतलें आहे, तरी नाथ भक्तांनी अवश्य यथाशक्ति मदत करावी. तसेंच कार्यालयांत नाथांचें सर्व वाङमय मिळण्याची व्यवस्था केली आहे.

आपली,
**सौ. शारदाबाई नाथवाले.**
व्यवस्थापक.

# पैठण पहा

**पंठण येथें येण्याचे मार्ग –**

१) औरंगाबादेहुन पैठण ३२ मैल आहे बस सर्व्हिसची उत्तम सोय आहे.

२) पुणे ते पैठण (अहमदनगर मार्गे) थेट बसची व्यवस्था आहे.

३) (बीड मार्गे) पाचोडहून पैठण येथें येण्यासाठी आतां बस सर्व्हिस सुरु झाली आहे.

**उतरण्याची सोय –**

पैठण येथें आल्यावर उतरण्यासाठीं १ बाहेरील श्री नाथ मंदीर २ मारवाडी धर्मशाळा, ३ श्रीरामलाल बाबा भोपळे यांचाहि एक मठ आहे शिवाय आणखीहि धर्मशाळा आहैत

**प्रतिष्ठानचे उल्लेख –** माजी जिल्हाधिकारी, औरंगाबाद श्री. **सेतु माधवराव पगडी** यांनी एक प्रतिष्ठान फलक गांवातील नाथ मंदिरात लाविलेला आहे. त्यांत पैठणचे उल्लेख दिलें आहेत. त्या वरुन पैठणच्या इतिहासाची पूर्णपणें माहिती मिळते.

**श्री एकनाथ –** जन्म शके १८५२ (नाथांच्या जन्मकालाबद्दल मतभेद आहेत.) निर्याण शके १५२१ फाल्गुन वद्य ६ रविवार, वडीलांचे नांव सूर्यकांत, आई रुक्मिणीबाई. लहानपणी आई वडील वारले. आजा-आजीने पालन पोषण केले. लहानपणापासून विरक्त. श्रीजनार्दन स्वामीचा उपदेश, त्यांच्या आज्ञेप्रमाणें पैठण येथे अवतार कार्य केले.




जनार्दन महाराजांच्या आज्ञेवरून नाथांनी चतुःश्लोकी भागवतावर टीका लिहिली, हा त्यांचा पहिला ग्रंथ आहे



नाथ भागवत वाचित असतांना काशीतील पंडितांनी त्यांचा ग्रंथ भागिरथींत फेकून दिला,
तो भागिरथीने प्रत्यक्ष श्रीपाद स्वामींना परत केला.

नाथांचे मुख्य ग्रंथ एकनाथी भागवत, भावार्थ रामायण, रुक्मिणी-स्वयंवर, चतुःश्लोकी भागवत, हस्तामलक, शुष्काष्ठक, स्वात्मसुख, आनंदलहरी, पदे, भारुडे, इत्यादि प्रसिद्ध आहेत. दरवर्षी फाल्गुन वद्य ५ तें ८ पर्यन्त यात्रा भरत असतें.

**श्री कृष्ण दयार्णव--** राहणारें कोपारुड अथवा कोपरडे. वडिलांचे नांव शंभुमणि, आईचें नांव बहिणाबाई अथवा बहिणादेवी. जन्म वैशाख शुद्ध ३ शके १५९६ लहानपणी लग्नानंतर आई वडील स्वर्गवासी झाले. गोविंदमहाराजांचा अनुग्रह, सांप्रदाय एकनाथांचाच आहे. यांचें मुळचे नांव नरहरी होते. कृष्ण उपासक व कृष्ण कृष्ण नेहमी नामस्मरण करीत असल्यामुळे 'कृष्ण दयार्णव' असे लोंक म्हणू लागले.

निर्माण शके १६६२ मार्गशीर्ष शुद्ध ५ रोज गुरुवार श्री दयार्णवाचे मुख्य ग्रंथ १. हरिवरदा, २. विचार चंद्रिका, ३. दत्त जननोत्सह. ४ तन्मयानंद बोध इत्यादी प्रसिद्ध आहेत.
पैठण येथे दरवर्षी मार्गशीर्ष शुद्ध ३ ते ६ पर्यन्त उत्सव होतो.

**श्री अमृतराय--** हे मूळचे राहणारे फत्तेखेरडा ता. मेहकरचे होते. जन्म काल शके १६२०, औरंगाबाद येथे वास्तव्य, मध्वमुनीचा सहवास झाला व त्यांचाच अनुग्रह मिळाला. हे एक प्रसिद्ध कितंनकार तसेच उत्तम कवीहि होतें. हिंदी भाषा फारच उत्तम अवगत होती. याचे कटाव पदे अभंग प्रसिद्ध आहेत. निर्याण शके १६७५ चैत्र शुद्ध ६. दर वर्षी पैठण येथें चैत्र शुद्ध ५ ते ८ पर्यन्त उत्सव होत असतो.

**श्री शिवदीन नाथ--** मुळचे राहणारे पैठण. घराणा जोशी वडिलांचे नांव हरिहर, आईचें नांव सरस्वतीबाई. शिवदीन नाथांचें मूळ नांव सदाशीव पुढे चालून शिवदीन नाथ झाले यांचा जन्म शके १६२० वैशाख कृष्ण ७ शुक्रवारी झाला. हें योग साधनी पुरुष होते. केसरी नाथांचा अनुग्रह झाला. तें पार्थीव पुजा नित्य करीत असत. त्यांनी

अनेक अभंग, पदे केली आहेत. त्यांनी 'ज्ञान प्रदीप' नांवाचा प्राकृत ग्रंथ लिहीला आहे. निर्याण शके १६९६ माघ वद्य १४ सोमवार महाशिवरात्रीचें दिवशी.

दर वर्षी माघ वद्य १४ ते फाल्गुन शुद्ध १ पर्यन्त उत्सव होत असतो.

**बाहेरील नाथ मंदीर--** या भागाला पूर्वी वृदांवन म्हणत असत. या ठिकाणी श्री ब्रम्हदेवाने श्रो गोपाल कृष्णाच्या सगुण दर्शनासाठीं बारा वर्षे पर्यन्त अनुष्ठान केले. त्यावर भगवान गोपाल कृष्ण प्रसन्न झाले व त्यास दर्शन देण्यासाठीं तेथें आलें.



भगवंताचें दर्शन होताच ब्रम्हदेवास आनंद झाला व त्यांनें देवास असा वर मागितला कीं आपलें दर्शन मला नित्य घडेल व आपलें अस्तित्व तेथें सदोदित राहील असा उपाय सांगा.

या प्रमाणें वर मागितला असता गोपाल कृष्णानें ब्रम्हदेवास वृन्दावनाची स्थापना व या सद्या असलेल्या पादुकेची स्थापना करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ब्रम्हदेवानें वृन्दावनाची व या पादुकेची स्थापना प्रत्यक्ष गोपाल कृष्णाकडून केली. व ब्रम्हदेवास लक्ष्मीसह दर्शन देऊन त्याचा मनोरथ पूर्ण केला अशी दंतकथा ऐकण्यांत आली आहे.

वरील प्रमाणेंच बिल्व मंगल ब्राम्हणाची हकिकत प्रतिष्ठान महात्म्यांत वर्णन केली आहे व त्यालाहि श्रीकृष्णाचा साक्षात्कार येथेंच झाला.

**कृष्ण कमला तीर्थं --** बाहेरील नाथमंदिराच्या पश्चिम भागात वाहणाऱ्या गंगा प्रवाहास कृष्ण कमला तीर्थ म्हणतात. येथें गोपाल-कृष्णाने व जांबुवंतीनें स्नान केलें, स्नान करीत असता क्षणी जांबुवतीला लक्ष्मीचे सौंदर्य प्राप्त झालें. नाथ देखील दररोज त्रिकाल स्नान येथेच करीत असत. या भागाबद्दल खालील श्लोक व तुकारामाचा अभंग प्रसिद्ध आहे

श्लोक :-- प्रतिष्ठानमिजं क्षेत्र सर्व तीर्थैः सुमंडित । स्वनिवासार्थमकरोत्ब्रम्हा लोक पितामहः ॥१॥ अभंग ॥ तुकाराम चरण २/३
कृष्ण कमला तीर्थ चरण नाथांचे । उद्धरी जगाचें कलि दोष ॥२॥ तीर्थी जो स्नान तत्पदीगमन पूर्वजा उद्धरण कुळासहित ॥३॥ तुका म्हणें वारी तया बोलणें

**नाथांची समाधी --** श्री एकनाथ महाराज देखील याच पादुकेचीं पूजाअर्चा करीत होते. शिवाय गोकुल अष्टमी व नाथषष्टीच्या वेळीं येथेंच दिंडी, किर्तन व काला करीत असत. आतांहि येथेंच दहिहंडीं, किर्तन वगैरे नाथषष्ठींच्या वेळेंस होत असतें. नाथ निर्याणानंतर याच समाधीला "**नाथ समाधी**" असे नांव पडलें. नाथाचा अवतार कृष्णाचाच होता असें म्हटल्यास चूक होणार नाही.

**वानोळे साहूकारांची यज्ञभूमी --** बाहेरीं नाथ मंदिराच्या पश्चिम दरवाजाजवळ जी दगडाची फरशी आहे तेथें वानोळें यांनी यज्ञ केला असे सांगण्यांत येतें व त्यांचा वाडा गांवातील नाथमंदिराजवळ आहे. याच भागांत श्रीदत्तमंदिर, श्री गाढेश्वर मंदिर. श्री ढोलेश्वर मंदिर, श्री झेंडूजीबुवाचा मठ, श्री गिरजा देवीचें स्थान आहे. परदेश-पुऱ्यात एक पुरातन जैन मंदीर ही पाहण्या सारखे आहें.

गांवातील नाथ मंदीरास यतानां श्री उदासी बुवांचा मठ, श्री कृष्ण दयार्णवाचा मठ, श्री शिवद्दीन नाथांचा मठ व गांवातील अमृतरायजींचा मठ आहें. येथील श्रीकृष्णमूर्ति पाहण्यासारख्या आहेत.

**गांवातील नाथ मंदिर** -- या मंदिराच्या महाद्वाराचे भितीला श्री दत्तात्रयाचे चित्र प्रत्येक गोकुळ अष्टमीच्या उत्सवाचे वेळीं काढण्यांत येतें. नाथांच्या घरीं श्री दत्तात्रयानें चोपदारकीचे कार्य केले असल्याचा तो इतिहास आहे. श्रीसंत दासोपंतांना याच महाद्वारांत श्री दत्तात्रयाचे सगुण दर्शन झाले. ए. च. केशवकृत अध्याय २५ मध्यें याचा उल्लेख आहें.

**नाथाचा रांजण** -- मंदिरांत गेल्यावर डाव्या बाजूला देवाचा रांजण आहे. या रांजणांत श्री गोपाल कृष्णाने श्रीखंडयाचें रुप घेऊन बारा वर्षे श्री नाथ घरी आवडीनें व कावडीनें पाणी वाहिले. आहे. फाल्गुन वद्य २ स, या रांजणाचा उत्सव असतो. यांत बाराहि महिने पाणी असते.

**नाथांचा राहता वाडा** -- रांजणाला लागूनच नाथांचा राहता वाडा आहे. या वाडयांत त्यांचे वंशज श्री. भागवतबुवा हल्ली राहतात

**पुराण व उद्धव खांब** -- मंदिराच्या गाभाऱ्यांत प्रवेश करतांना समोर दोन खांब आहेत. दक्षिण बाजूच्या खांबाला टेकून नाथ पुराण सांगण्यासाठीं बसत असत व उत्तर बाजूचा खांब उद्धव खांब आहें. त्यावर 'श्री उद्धव' ही अक्षरे आहेंत. याच खांबातून श्री खंडया रुपी श्री कृष्ण प्रगट झाले व नाथांना दर्शन दिले.

**मंदिराच्या गाभाऱ्यात** -- हे नाथाचे वंशपरंपरेचे देव घर मुख्य मुर्ति श्री विजयी पांडूरंगाची आहे. 'दास जेऊं घाला न घाला' अशी अक्षरें उमटलेल्या विटेवर उभी आहे. नाथांनींच या मूर्तीची स्थापना केली. ए. च. केशवकृत अध्याय १३ यांत हे प्रकरण आहे. त्याची थोडक्यांत हकिकत पुढीलप्रमाणें आहें






ज्या श्रीकृष्णानीं श्रीखंड्याचे रूप घेऊन १२ वर्षे पर्यन्त कावडीनें पाणी वाहिले व गंध उगाळले ते छायाचित्र.



नाथ किर्तनद्वारा लोंक जागृती करीत आहेत.

कर्नाटक प्रांतातील एका श्रीमंत साहुकारानें वरील मुर्ति आपल्या घरी स्थापण करण्यांकरितां पंच धातूंची तयार केली व प्राणप्रतिष्ठा करणार. तो त्याला रात्रीं दृष्टांत झाला कीं " तूं येथे स्थापन करू नकोस, पैठण येथें श्री एकनाथांचे घरी मला घेऊन जा व नाथाच्या घरी नाथांचे हस्ते तेथेच स्थापना कर.

श्लोक :- " गंगातीरी प्रतिष्ठान । तेथें एकनाथ असे जाण ।
शीघ्र जाऊनि आपण । मूर्ति अर्पण कीजे त[illegible] ॥१॥
तेथेचि व्हावी प्रतिष्ठा। हे माझी निज उत्कंठा।
येथें आग्रह करितां कष्टा। अति उत्कटा भोगिसी ॥२॥

त्या प्रमाणें तो मूर्तीस पैठण येथें घेऊन आला नाथांनी मूर्तीची स्थापना केली आरतीच्या वेळीं-

" नाथ म्हणती तये वेळा । या काळींचा सूख सोहळा ।
भक्षूनि नवनीत गोळा । देव लीला प्रगटावी ॥

या प्रमाणें नाथांनी प्रार्थना करतांच- ऐकोनि श्री नाथ वचन
मूर्ति होऊनि हास्य वदन । बाहेर जीभ काढून ।
करतळ चाटून भक्षिले ॥

हा प्रकार पहाताच सर्वांनी जय जयकार केला. आरती झाल्यावर नाथांनी त्या मूर्तीचे नांव ' विजयी पांडुरंग ' असे ठेविले आहे.

**श्री खंड्या चंदन उगाळूनि --** गाभाऱ्यांत उजव्या बाजूस विठ्ठल रुक्मिणीच्या मूर्ति आहेत. तेथेच श्रीखंड्यानें ज्या साहणेवर गंध उगाळिलें तीं साहाण स्थापन केलेली आहे.

**नाथास गुरुपत्र दर्शन --** मंदिराच्या उत्तरेकडे मुंजाचे नाथकालीन एक स्थान आहे. येथेंच नाथांची व त्यांच्या आजोबाची तिर्थ-यात्रे नंतर भेट झाली. व त्यांनी नाथानां जनार्दन स्वामीचें गुरु-पत्र

दिलें. व नाथ पुढें येंथेच राहिले. येंथेच नाथाचें आजोबा चक्रपाणी व त्यांचें कुटुंब सौ. सरस्वतीबाई राहत होते.

**पुर्वीचें पैठण** – नागघाटाच्या पूर्व भागाला पूर्वी पैठणची वस्ती होती या भागात तीर्थ खांब, महानुभाव पंथाचे पुरातन मंदिर अथवा मठ आहें. शालिवाहनाचा राजवाडा देखील याच भागांत होता. असें सांगण्यांत येते. श्री. धोंडिबुवाचा मठ याच भागांत आहें

**ज्ञानेश्वराचा रेडा** -- या घाटावर ज्ञानेश्वराने रेड्यामुखी वेद बोलविलें आहेत त्याचा साक्ष अथवा प्रतीक म्हणून येथें एक दगडाचा रेडा भिंतीत बसविलेला दिसत आहे. नाग घाटाच्या मोठ्या बुरुजावर दोन शिला लेखापैकीं, एका शिला लेखावरुन घाट केंव्हां व कोणी बांधला याचा इतिहास मिळू शकतो. दुसरा लेख पाण्यामुळें झिजून गेला लेखाचा सारांश शके १६५६ माघ शु ।। ९ रघुपति तनयें घाट आनंद राय अशी अक्षरे वाचतां येतात. इतर अक्षरे स्पष्ट वाचता येत नाहीत.

**कुचर ओटा** – ज्या ओट्यावर बसून पैठणचें ब्राम्हण नाथांची अथवा इतरांची निंदा करत तो कुचर ओटा गांवात परळ करांच्या मठाजवळ आहें.

दरगा :– सध्या गांवाच्या पुर्व भागाला श्री मौलाना साहेबाची तसेंच श्री सय्यद सादात साहेबांची हि दरगा आहे.

**नव नाथाच्या समाध्या** -- याच भागांत कुलभाआळोजवळ पांच सहा वर्षापूर्वी कांही समाध्यांचा शोध लागला आहे. या समाध्या भुयारांत असून नव-नाथांच्या आहेत. असे सांगण्यांत येतें, या शिवाय श्री नृसिह मंदीर व हरिहरेश्वराचे मंदिर व रेणुकादेवी इत्यादि प्रसिद्ध स्थळे आहेत.



फा व. ६ रविवार शके १५२१ रोजी कृष्ण कमला तीर्थाच्या भव्य वाळवंटात ' अवघेचि त्रैलोक्य आनंदाची आता '
या आभंगावर कीर्तन करुन नाथानीं आपले कार्य संपविलें.

**ज्ञानेश्वराची जन्मभूमी** – पैठणहून ६ मैल पुर्वेस ज्ञानेश्वराची जन्मभूमि आपेगांव आहे. तेथें कार्तिक वद्य १३ दर वर्षी मोठा उत्सव होत असतो.

**कृष्ण कमला मंदिर**– बाहेरील नाथ मंदिराच्या पश्चिम भागांत . ह. भ. प. नारायणबुवा पालखीवाले यांची समाधी असून त्यांच्या स्मरणार्थ कृष्ण कमला मंदीराची स्थापना केली आहे. मूर्ति प्रेक्षणीय आहेत.

**गोदावरी धरण**-- पश्चिम व पुर्व दिशेला पैठणहून २ मैलाच्या अंतरावर जयकवाडी धरण (गोदावरी धरण) योजनेचे काम सुरु आहे.

**– वार्षिक महोत्सव –**

१) जेष्ट वद्य ७ स श्री नाथांची पालखी पैठणहुन पंढरीस जाते

२) आषाढ शुद्ध ११ ते आषाढ वद्य १, भानुदास महाराजांची पुण्य तिथी साजरी होते.

३) श्रीकृष्ण जयति श्रावण वद्य ८ ते १२ पर्यन्त.

४) हरिजागर कार्तिक शुद्ध ११ ते कार्तिक वद्य १ .

५) श्री दत्त जयंती, मार्गशीर्ष शुद्ध १५ .

६) रांजणाचे पूजन, फाल्गुन वद्य २ .

७) नाथ-षष्ठी फाल्गुन वद्य ६ ते ८ ला काला व लळीत होते.

समाप्त

